**अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण केंद्र व मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र यांचे प्रलंबित अनुदानाकरिता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२०/प्र.क्र.१३/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १९ मार्च,२०२४

**संदर्भः-** महिला व बाल विकास शा. नि. क्र. एबावि-२०२०/प्र.क्र.१३/का.६, दि. २५.११.२०२२

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेमधील अंगणवाडी कर्मचारी प्रशिक्षण केंद्र व मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र यांचे सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील प्रलंबित अनुदान अदा करण्याकरिता उपलब्ध केंद्र हिश्याखालील तरतुदीच्या मर्यादेत सदर शासन निर्णयान्वये खालील विवरणपत्रातील रकाना क्रमांक-१ मधील प्रधान लेखाशीर्ष/उपशीर्ष/उद्दिष्टामध्ये रकाना क्रमांक-२ मध्ये नमूद अर्थसंकल्पित तरतुदीमधून रकाना क्रमांक-४ मध्ये दर्शविल्यानुसार एकुण रुपये ३६८.३७ लाख एवढा निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये लाखात)**

| लेखाशिर्ष व बाब | अर्थसंकल्पित तरतूद २०२३-२४ | यापूर्वी वितरीत तरतुद | या आदेशान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २२३६- पोषण आहार<br>०२- पोषक अन्न व पेये यांचे वितरण<br>००३- प्रशिक्षण<br>(०१)- अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण व मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र यांना अनुदान<br>(०१)(०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण व मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र यांना अनुदान (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>२२३६ २००१<br>३१- सहा. अनुदाने वेतनेतर | ४७९.७० | --- | २२१.०२ |
| (०१)(०२) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत अंगणवाडी कार्यकर्ती प्रशिक्षण व मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र यांना अनुदान (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>२२३६ २०१२<br>३१- सहा. अनुदाने वेतनेतर | ३१९.८० | --- | १४७.३५ |
| **एकूण** | **७९९.५०** | ---- | **३६८.३७** |

२. केंद्र शासनाकडून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर APIP च्या मर्यादेत वरीलप्रमाणे त्यांच्या हिश्याचा निधी उपलब्ध करून घेण्याबाबत एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय स्तरावरून कार्यवाही करण्याच्या अधीन राहून सदर निधी वितरण आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

त्याकरिता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी यासंदर्भात केंद्र शासनाकडे पाठपुरावा करावा.

३. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी वरीलप्रमाणे उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीच्या मर्यादेत संबंधित प्रशिक्षण केंद्रांचे सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील प्रलंबित अनुदान अदा करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७२/१४७२, दि. २०.०२.२०२४ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक-५१/व्यय-६, दिनांक ०६.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१९१२१६२४६६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.03.20 11:33:59 +05'30'

(वि.रा.ठाकूर)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
६) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
८) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास) (जिल्हा परिषद)
९) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१०) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई.
११) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती -का-६.